**सन २०१६-१७ च्या अर्थसंकल्पीत निधीमधून शासनमान्य सार्वजनिक ग्रंथालयांना सहाय्यक अनुदान (योजनेतर) वितरीत करणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**उच्च व तंत्र शिक्षण विभाग**
**शासन निर्णय क्रमांक - मराग्रं-२५१७/(१३४/१६)/साशि-५,**
मंत्रालय विस्तार, मुंबई-४०० ०३२.
दिनांक : ०६ मार्च, २०१७

वाचा : १) वित्त विभागाचे परिपत्रक क्र अर्थसं-२०१६/प्र.क्र.८९/अर्थ ३,दि. २०.०४.२०१६.
२) उच्च व तंत्र शिक्षण विभागाचे पत्र क्र लेखानु-२०१६/प्र.क्र.४४/साशि १, दि. २०.०४.२०१६
३) उच्च व तंत्र शिक्षण विभाग शासन निर्णय क्र. मराग्रं २५१७/प्र.क्र.१३४/१६/साशि ५, दि.११.०७.२०१६
४) ग्रंथालय संचालनालयाचे पत्र क्र.३२/२०१६-१७/१३३४६-४७, दि. १०.०१.२०१७
५) वित्त विभागाचे परिपत्रक क्र. अर्थसं -२०१७/प्र.क्र.८९/अर्थ -३, दि. ०८.०२.२०१७

**प्रस्तावना -**

राज्यातील एकूण ११,९९० शासनमान्य सार्वजनिक ग्रंथालयांना सन २०१६-१७ करिता रुपये १२५००.०० लक्ष इतका निधी अर्थसंकल्पीत करण्यात आला आहे. संदर्भ क्र. १ नुसार अर्थसंकल्पीत निधी खर्च करण्याची मर्यादा ८०% एवढी विहित करण्यात आलेली आहे. शासनमान्य सार्वजनिक ग्रंथालयांच्या परिरक्षण अनुदानाच्या पहिल्या हप्त्यासाठी त्यांच्या दर्जा/ वर्गनिहाय एकूण रुपये ५४३८.९४ लक्ष इतका निधी संदर्भ क्र. ३ च्या शासननिर्णयान्वये वितरीत करण्यात आलेला आहे. संदर्भ क्र ५ येथील वित्त विभागाच्या परिपत्रकानुसार महाराष्ट्र विनियोजन विधेयक २०१६ निधी वितरणानुसार सन २०१६-१७ चा उर्वरित कालवधी वितरीत निधी योजनेतर खर्चाची मर्यादा ९० % विहित करण्यात आलेली आहे. त्यानुसार सन २०१६-१७ वर्षासाठी मध्यवर्ती, जिल्हा व तालुका ग्रंथालयांना सहाय्य (२२०५ ०२९८) (योजनेत्तर) ३१ सहाय्यक अनुदाने (वेतनेतर) या लेखाशीर्षाखाली ९०% च्या मर्यादेत उर्वरित निधी रु. ५८११.०६ लक्ष निधी वितरित करुन खर्च करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय:**

शासनमान्य सार्वजनिक ग्रंथालयांच्या सहाय्यक अनुदानासाठी सन २०१६-१७ करिता रुपये १२५००.०० लक्ष इतका निधी अर्थसंकल्पीत करण्यात आला आहे. वित्त विभागाच्या परिपत्रक क्र अर्थसं-२०१५/प्र.क्र.८९/अर्थ ३, दि. २०.०४.२०१६ नुसार अर्थसंकल्पीत निधी खर्च करण्याची मर्यादा ८०% विहित करण्यात आलेली आहे. त्यानुसार सहाय्यक अनुदानासाठी अर्थसंकल्पीत मंजूर तरतूदीपैकी ८०% म्हणजे रु.१००००.०० लक्ष निधीपैकी रु. ५४३८.९४ लक्ष निधी वितरीत करण्यात आलेला आहे. सदर लेखाशीर्षाखाली ८०%च्या मर्यादेत उर्वरित रु. ४५६१.०६ लक्ष इतका निधी तसेच संदर्भ क्र. ५ च्या परिपत्रकानुसार १०% च्या मर्यादेत रु. १२५०.०० लक्ष इतका असे एकूण मिळून रु. ५८११.०६ लक्ष (रुपये अठ्ठावन्न कोटी अकरा लक्ष सहा हजार फक्त )निधी **वितरीत तरतूद पूर्ण खर्च करण्याच्या अटीच्या** अधीन राहून वितरीत व खर्च करण्यास ग्रंथालय संचालक, ग्रंथालय संचालनालय, मुंबई यांना शासन मान्यता देण्यात येत आहे.

२. हा निधी मागणी क्रमांक डब्ल्यू- ४, २२०५ कला व संस्कृती, १०५, सार्वजनिक ग्रंथालये, (०३) मध्यवर्ती, जिल्हा व तालुका ग्रंथालयांना सहाय्य, (०३) (०१) मध्यवर्ती, जिल्हा व तालुका ग्रंथालयांना सहाय्य (२२०५ ०२९८) (योजनेतर) ३१, सहाय्यक अनुदाने (वेतनेतर) या लेखाशिर्षाखाली शासनमान्य सार्वजनिक ग्रंथालयांच्या परिरक्षण अनुदानासाठीचा खर्च चालू वर्ष सन २०१६-१७ या आर्थिक वर्षातील तरतूदीतून भागविण्यात यावा.

३. सदर शासन निर्णय वित्त विभागाच्या दि. २०/०४/२०१६ व दि. १७/०१/२०१७ च्या परिपत्रकातील अटी व शर्तींचे व वेळोवेळी दिलेलया सूचनांना अनुसरुन निर्गमित करण्यात येत आहे. सदर परिपत्रकाच्या परिशिष्टातील अनुक्रमांक ९ मध्ये नमूद अटींची तसेच या परिपत्रकातील परिच्छेद ७ ते १८ मधील अटींची पूर्तता होत आहे. सदरचा खर्च करण्यासाठी संबंधित जिल्हा ग्रंथालय अधिकारी कार्यालयाच्या कार्यालय प्रमुखांना आहंरण व संवितरण अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे. अनुदानाच्या रक्कमेची उपयोगिता प्रमाणपत्रे संबंधित कार्यालय प्रमुखांनी विहित मुदतीत सादर करणे आवश्यक राहील.

४. सदरचा निधी वितरीत करण्यास वित्त विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्र. ९०/व्यय-५, दिनांक २५/०१/२०१७ अन्वये मान्यता मिळाली आहे.

४. हा शासन निर्णय शासनाचे www.maharashtra.gov.in या संकेत स्थळावर उपलब्ध असून त्याचा सांकेतांक क्रमांक २०१७०३०६१७२८३७८५०८ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

Suvarna Hemchandra Patankar

Digitally signed by Suvarna Hemchandra Patankar
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Higher And Technical Edu, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=ed71ebecc5e77faa2bc326ad6465ee69e8ce4b095cb873186b176c646b34cc28, serialNumber=3740f7b9e520ea4fc9d0c8cae45a7132db5b499301d6caff46360639be7adc8b, cn=Suvarna Hemchandra Patankar
Date: 2017.03.06 17:30:47 +05'30'

**( सु.हे.पाटणकर )**
कक्ष अधिकारी, महाराष्ट्र शासन

**प्रति,**

१. महालेखापाल-१ (लेखापरीक्षा/लेखा व अनुज्ञेयता), मुंबई
२. महालेखापाल-२ (लेखापरीक्षा/लेखा व अनुज्ञेयता), नागपूर
३. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई
४. संबंधित सर्व जिल्हा कोषागार/ उपकोषागार अधिकारी, कोषागार कार्यालय
५. ग्रंथालय संचालक, महाराष्ट्र राज्य, मुंबई
६. निवासी लेखापरीक्षा अधिकारी, मुंबई
७. अ.मु.स. (उ.व तं.शि.) यांचे स्वीय सहाय्यक
८. अवर सचिव (साशि १) मंत्रालय, मुंबई
९. निवडनस्ती (साशि-५).